परिविक्षाधीन कालावधी वाढविणे/समाप्ती
आणि उप अधीक्षक भूमी अभिलेख गट-ब
<u>संवर्गात कायम करणेबाबत.....</u>

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : परिक्षा-२०१६/७७१/प्र.क्र.१७२/ई-६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २० मे, २०१७

वाचा :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आस्था-२०११/१०६/प्र.क्र.२५/ई-६, दिनांक २०.१०.२०११
२) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक : परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ दिनांक २५.०८.२०१५

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या खालील विवरणपत्रातील ०५ उमेदवारांना शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. आस्था-२०११/१०६/प्र.क्र.२५/ई-६,दि.२०.१०.२०११ अन्वये परिविक्षाधीन उप अधीक्षक भूमी अभिलेख गट-ब संवर्गामध्ये नेमणूक देण्यात आली आहे. त्यानुसार खालील विवरणपत्रातील स्तंभ क्र. २ मध्ये परिविक्षाधिन उप अधीक्षक भूमी अभिलेख यांची नावे व स्तंभ क्र.३ मध्ये उमेदवार ज्या दिनांकाला सदर पदावर हजर झाले आहेत तो दिनांक व त्यानुसार त्यांचा २ वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होणार आहे तो दिनांक नमूद करण्यात आला आहे. तथापि, खालील विवरणपत्रातील स्तंभ क्र. २ मधील अ.क्र. १ ते ४ उमेदवारांनी परिविक्षाधीन कालावधीत स्तंभ क्र.४ नुसार रजा उपभोगलेली आहे, त्यांचा परिविक्षाधीन कालावधी स्तंभ क्र.५ प्रमाणे वाढविण्यात येत आहे.

२. त्याचप्रमाणे श्रीमती गवई या यशदा, पुणे येथील पायाभूत प्रशिक्षण कालावधीत रजेवर असल्याने त्यांनी सदर प्रशिक्षण पूर्ण केले नसून, दिनांक ०७.११.२०१६ ते दिनांक १८.१२.२०१६ या कालावधीमध्ये मराठवाडा प्रशासकिय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर), पैठण, जिल्हा औरंगाबाद येथे सदर पायाभूत प्रशिक्षण पूर्ण केलेले आहे. त्यामुळे त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी हा पायाभूत प्रशिक्षण पूर्ण झाल्याच्या दिनांकाला स्तंभ क्र.५ प्रमाणे वाढविण्यात येत आहे.

३. खालील विवरणपत्रातील सर्व ०५ उमेदवारांनी भूमि अभिलेख अर्हता परीक्षा उत्तीर्ण केलेली असून, परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला आहे. सदर उमेदवारांचा तपशिल खालील प्रमाणे आहे :-

| अ. क्र | परिविक्षाधीन उप अधीक्षक भूमी अभिलेख यांचे नाव | हजर दिनांक व २ वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी पुर्ण होणारा दिनांक | परिविक्षाधान कालावधीत घेतलेली रजा कालावधीचा दिनांक (एकूण दिवस) | रजेमुळे/प्रशिक् षणा मुळे पुढे जाणारा परिविक्षाधीन कालावधीचा दि | नियमीत नियुक्ती दिलेले पद व हजर दिनांक | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.गणेश बाबासाहेब कराड | दि.१७.११.२०११<br>दि.१६.११.२०१३ | १) दि.१४.३.२०१३ ते ९.४.२०१३ = २७ दिवस<br>२) दि.१०.४.२०१३ ते दि.१२.४.२०१३= ३ दिवस | ०६.०२.२०१४ | उप अधीक्षक भूमि अभिलेख, समुद्रपुर दि.७.२.२०१४ | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक - रित्या पूर्ण केला आहे. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | ३) दि.१०.०६.२०१३ ते दि. १५.६.२०१३ = ६ दिवस<br>४) दि.२३.१२.२०१३ ते दि.६.२.२०१४=४६ दिवस<br>एकूण = ८२ दिवस | | | |
| २ | श्री. उमेश मोहन झेंडे | दि.१९.११.२०११<br>दि.१८.११.२०१३ | १) दि.१.६.२०१२ ते १३.६.२०१२ = १३ दिवस<br>२) दि.२५.३.२०१३ ते दि.९.४.२०१३= १६ दिवस<br>३) दि.१०.०४.२०१३ ते दि. १६.४.२०१३ = ७ दिवस<br>४) दि.६.५.२०१३ ते दि.३०.५.२०१३= २५दिवस<br>एकूण = ६१ दिवस | १८.०१.२०१४ | उप अधीक्षक भूमि अभिलेख, हिंगणघाट दि.१९.१.२०१४ | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक - रित्या पूर्ण केला आहे. |
| ३ | श्रीमती मंगल केरबा बुरसे | दि.०१.११.२०११<br>दि.३१.१०.२०१३ | १) दि.१२.३.२०१२ ते १६.३.२०१२ = ५ दिवस<br>२) दि.१.६.२०१२ ते दि.८.६.२०१२= ८ दिवस<br>एकूण = १३ दिवस | १३.११.२०१३ | उप अधीक्षक भूमि अभिलेख, दक्षिण सोलापूर दि.१४.११.२०१३ | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक - रित्या पूर्ण केला आहे. |
| ४ | श्री. राजेंद्र रघुनाथ लोंढे | दि.१५.११.२०११<br>दि.१४.११.२०१३ | १) दि.१.९.२०१२ ते ५.९.२०१२ = ५ दिवस<br>२) दि.२४.६.२०१२ ते दि.२२.७.२०१२= २९दिवस<br>एकूण = ३४ दिवस | १८.१२.२०१३ | उप अधीक्षक भूमि अभिलेख, वाशिम दि.१९.१२.२०१३ | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक - रित्या पूर्ण केला आहे. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ५ | श्रीमती वैशाली शामराव गवई | दि.१९.११.२०११ दि.१८.११.२०१३ | १) दि.१४.५.२०१२ ते दि. २३.५.२०१३ = १० दिवस<br>२) दि.८.१.२०१३ ते दि.६.९.२०१३= २४२दिवस<br>एकूण = २५२ दिवस (१८० दिवस प्रसुती रजेसह)<br>तसेच दिनांक ७.११.२०१६ ते दि १८.१२.२०१६ पायाभूत प्रशिक्षण पुर्ण केले. | १८.१२.२०१६ | उप अधीक्षक भूमि अभिलेख, औसा दि.३०.७.२०१४ | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक - रित्या पूर्ण केला आहे. |

४. उपरोक्त विवरणपत्रातील उमेदवारांनी परिविक्षाधीन कालावधीत रजा उपभोगलेली आहे त्यांच्या रजेच्या तसेच पायाभूत प्रशिक्षण पूर्ण होण्याच्या कालावधीएवढा परिविक्षाधीन कालावधी वाढविण्यात आलेला आहे. हा वाढीव परिविक्षाधीन कालावधी त्यांनी समाधानकारकरित्या पूर्ण केला आहे व ते भूमि अभिलेख अर्हता परीक्षा उत्तीर्ण झाले आहेत. तसेच परिविक्षाधीन कालावधीमध्ये या उमेदवारांविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित नाही. सबब, उपरोक्त ५ परिविक्षाधीन उप अधीक्षक भूमि अभिलेख यांचा परिविक्षाधीन कालावधी वरील विवरणपत्रातील त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.५ मधील दिनांकापासून (म.पू.) पासून समाप्त करण्यात येत आहे व त्यांच्या सेवा नियमीत उप अधीक्षक भूमि अभिलेख गट-ब म्हणून पुढे चालू ठेवण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२०१५३४१६८२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.05.20 15:36:34 +05'30'

**( डॉ.संतोष भोगले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) उपसंचालक भूमि अभिलेख, (सर्वसाधारण), संलग्न जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य,पुणे.
३) सर्व उपसंचालक भूमि अभिलेख द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
५) संबंधीत अधिकारी (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, म.रा.पुणे)
६) निवडनस्ती कार्यासन ई-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.